परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याकरिता जागा उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९/२०/शिक्षण-१**

**९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.**

**दिनांक:- १७ एप्रिल, २०२३.**

वाचा :-

१) मा.मंत्रीमंडळाच्या दि.०२.०३.२०२२ रोजीच्या बैठकीतील निर्णय.
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाचा शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९/२०/शिक्षण-१ , दि. २८.०३. २०२२.
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.डिएमईआर-१२०११/९/२०२२-ईडीयु, दि.२३.०६.२०२२.
४) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५.१२.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना :</u>

परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रूग्णखाटांचे रूग्णालय स्थापन करण्याच्या प्रस्तावास दिनांक ०२.०३.२०२२ रोजी मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून त्यानुषंगाने दिनांक २८.०३.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२. सदर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित रूग्णालयाकरिता मौजे ब्रम्हपुरी, ता. जि. परभणी येथील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अखत्यारीतील गट क्र. २, २०, ४७, ५३ येथील एकूण ५२.०६ हे. आर. इतकी जमीन महसूल विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास नि:शुल्क हस्तांतरीत करण्यास मा. मंत्रीमंडळाने उक्त बैठकीत मान्यता दिली आहे. तथापि, सदर प्रकल्पासाठी प्रस्तावित असलेली जमीन ही उद्योग विभागाच्या अखत्यारीतील मराठवाडा विकास महामंडळाची दुय्यम कंपनी-परभणी कृषी गोसंवर्धन मर्यादित यांच्या नावे असल्याचे निदर्शनास आले आहे.

३. दरम्यानच्या कालावधीत ५२.०६ हे. आर ऐवजी मौजे ब्राम्हणगाव व मौजे ब्रम्हपूरी तर्फे लोहगाव येथील केवळ २० हे. आर इतकी जमीन हस्तांतरीत करण्याची विनंती जिल्हाधिकारी, परभणी यांच्या दि.१०.०३.२०२२ च्या पत्राच्या अनुषंगाने आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी दि.२३.०६.२०२२ च्या पत्रान्वये शासनास केली होती. प्रस्तावित २० हे. आर जागेच्या हस्तांतरणाबाबत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग व उद्योग विभाग यांच्यात उपस्थित झालेल्या मुद्दयांच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०५.१२.२०२२ रोजी बैठक झाली. सदर बैठकीत ५२.०६ हे. आर ऐवजी २० हे. आर जमीन उपलब्ध करण्याबाबत व सदर जमिनीचे रेडीरेकनर मूल्य रु. २,३४,९१,०००/- (रुपये दोन कोटी चौतीस लक्ष

एक्याण्णव हजार फक्त) पुस्तकी समायोजनाद्वारे उद्योग विभागास अदा करण्याबाबत निर्णय झाला असून सदर निर्णयानुसार कार्यवाही करावी, असे निर्देश मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिले आहेत.

४. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५.१२.२०२२ च्या बैठकीत झालेला निर्णय, त्यानुषंगाने मा. मुख्यमंत्री महोदयांचे निर्देश तसेच उद्योग विभाग व वित्त विभाग यांचे अभिप्राय विचारात घेऊन परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याकरिता जागा उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:-**

१. परभणी येथील नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयाकरिता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागांतर्गत मराठवाडा विकास महामंडळाची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो संवर्धन मर्यादित यांच्या नावे असलेली तालुका परभणी व जिल्हा परभणी येथील मौजे ब्राम्हणगाव अंतर्गत गट क्र.३०९ मधील ८.४२ हेक्टर आर व गट क्र.१५५ मधील ७.७५ हेक्टर आर आणि मौजे ब्रम्हपूरी तर्फे लोहगाव येथील गट क्र. ०२ मधील ३. ८३ हेक्टर आर अशी वापरास योग्य असलेली एकूण २० हे. आर. इतकी जमीन उद्योग विभागाने महसूल विभागास प्रत्यावर्तीत करण्यास आणि महसूल विभागामार्फत सदर जमीन वैद्यकीय शिक्षण विभागास नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नीत रुग्णालय सुरु करण्याच्या प्रयोजनार्थ हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त २० हेक्टर आर जमिनीचे वार्षिक बाजारमूल्य दरतक्त्यानुसार येणारे मूल्य रु.२,३४,९१,०००/- (रुपये दोन कोटी चौतीस लक्ष एक्क्याण्णव हजार फक्त) इतके असून सदर मूल्य पुस्तकी समायोजनाने उद्योग विभागाकडे जमा करण्यात यावे.

३. उपरोक्त नमूद मूल्य उद्योग विभागाने उपलब्ध करून दिलेल्या पुढील लेखशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाद्वारे जमा करण्यात यावे.

**लेखाशिर्ष**-६८८५-उद्योग व खनिजे यासाठी इतर कर्जे

०२-मागास क्षेत्र विकास

१९०-सार्वजनिक क्षेत्रे व इतर उपक्रम यांना कर्जे

(०२) विकास महामंडळांस कर्जे

(०२)(०३) राज्य शासनाने प्रोत्साहन योजनांसाठी दिलेल्या कर्जाची मराठवाडा विकास महामंडळाकडून परतफेड

(६८८५ ५१४२ ०१)

४. परभणी येथे १०० प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित रूग्णालयासंदर्भात यापूर्वी शासन निर्णय दि.२८.०३.२०२२ अन्वये केलेल्या इतर तरतूदी कायम राहतील.

५. उपरोक्त वाचा-४ येथे नमूद दि.०५.१२.२०२२ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार तातडीची बाब म्हणून उद्योग विभागाने संबंधित जागेचा प्रत्यक्ष ताबा महसूल विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण विभागास देण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांनी महसूल विभागामार्फत संबंधित जागेचा प्रत्यक्ष ताबा घेण्याच्या अनुषंगाने या संदर्भातील कार्यवाही तातडीने पूर्ण करावी.

७. प्रस्तुत शासन निर्णय हा उद्योग विभागाचे दिनांक १३.१२.२०२२ चे अभिप्राय तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-५७/व्यय/१३, दिनांक ०३.०२.२०२३ रोजीच्या अभिप्रायानुसार आणि मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५.१२.२०२२ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१७१५२४४१८११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.04.17 22:49:46 -07'00'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री (वै. शि.), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

११. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली.
१२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, मुंबई.
१७. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१८. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१९. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२०. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
२१. जिल्हाधिकारी, परभणी.
२२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२३. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
२४. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, परभणी.
२५. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
२६. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. निवडनस्ती (शिक्षण-१).